डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या ८ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत
(कालावधी दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२)

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : विप्रप्र-२०२२/प्र.क्र.५४/१२-अ,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० मे, २०२२.

वाचा :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दिनांक ११.०५.२०१५
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक विप्रप्र २०१८/प्र.क्र.५१/१८/१२-अ, दिनांक ०९.०९.२०२१ .
३. संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती याचे क्रमांक प्रशा/व.लि./कावि-१२९/२०२२ दि.०९.०२.२०२२ चे पत्र.
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२.

शासन निर्णय:

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवरील ८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२१ ते दि. २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता संस्थेने संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये प्रस्तुत ८ अस्थायी पदांना तात्पुरत्या स्वरुपात मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. राज्य प्रशिक्षण धोरण २०११, अन्वये दि.१४.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत. या संस्थांमधील पदांचा आकृतिबंध एकसमान असणे आवश्यक असल्यामुळे संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये २० पदांचा आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे.

३. संस्थेमध्ये सद्य: स्थितीत राज्य प्रशिक्षण धोरणानुसार वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी कर्मचारी यांचे सुरू असलेले प्रशासकीय प्रशिक्षण या बाबींचा विचार करता, तसेच संस्थेमधील पदांचा सुधारित आकृतिबंधास मान्यता मिळण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता विचारात घेता, संस्थेच्या ८ अस्थायी पदांना मुदतवाढ देणे अपरिहार्य आहे.

४. उपरोक्त सर्व बाबींचा सर्वकष विचार करुन आता, प्रस्तुत शासन निर्णयान्वये डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या **८ अस्थायी पदांना दि.०१ मार्च, २०२२ ते दि. ३१ ऑगस्ट,२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ** देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांची नांवे | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | लेखाधिकारी वर्ग-२ (लेखाधिकारी संवर्ग) | १ पद | ९३००-३४८०० (ग्रेड वेतन ४६००) |
| २ | सत्र समन्वयक | २ पदे | ९३००-३४८०० (ग्रेड वेतन ४३००) |
| ३ | सत्र सहाय्यक | १ पद | ५२००-२०२०० (ग्रेड वेतन १९००) |
| ४ | शिपाई | १ पद | ४४४०-७४४० (ग्रेड वेतन १३००) |
| ५ | वाहन चालक | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ६ | चौकीदार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ७ | सफाईगार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| | **एकूण** | **८ पदे** | |

५. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.ए-४, **मुख्य लेखाशिर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा- (००३) प्रशिक्षण-(००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) ३६- सहाय्यक अनुदान ( वेतने )"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **सन २०२२-२०२३** या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क. दि.२२ फेब्रुवारी, २०२२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५१०१५३०४४१००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=783CA3332598C7E1C28393EA543FA05D9FB77F36A848F4738D12288E105699F4, cn=LEENA ASHISH SANKHE
Date: 2022.05.10 15:33:51 +05'30'

( लिना संखे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
३) मा. अ.मु.स. (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
५) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६) लेखाधिकारी, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती.
७) उप संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, अमरावती.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
९) उप कोषागार कार्यालय, अमरावती.
१०) वित्त विभाग, कार्यासन -आ.पु.क. व व्यय- ४ मंत्रालय, मुंबई-३२
११) निवड नस्ती.

********************